**धन्वंतरी शिक्षण व सामाजिक प्रतिष्ठान, पुणे संचालित प्रितम प्रकाश स्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, हडपसर या शाळेच्या किरकटवाडी, पुणे येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३२१/प्र.क्र.४५९/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०८ मार्च, २०२२

<u>वाचा :</u>

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१, दिनांक २८ जुलै, २०२१.**

<u>संदर्भ :</u>

**विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांचे क्र.शिउसं/पुणे/उमा-४०१/२०२२/१७७६ दिनांक २४ फेब्रुवारी, २०२२ चे पत्र**

<u>**प्रस्तावना :-**</u>

धन्वंतरी शिक्षण व सामाजिक प्रतिष्ठान, पुणे संचालित प्रितम प्रकाश स्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, हडपसर, पुणे या इंग्रजी माध्यमाच्या स्वयंअर्थसहाय्यित उच्च माध्यमिक शाळेच्या (इयत्ता ११ वी ते १२ वी-कला, विज्ञान व वाणिज्य शाखा), किरकटवाडी, पुणे येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यता देण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>**शासन निर्णय :-**</u>

संस्थेने उपरोक्त शाळा मेगा सेंटर, हडपसर या व्यापारी संकुलात असल्याने तसेच अपु-या भौतिक सुविधांमुळे संस्था सचिवांच्या जागेत किरकटवाडी, पुणे येथे स्थलांतर केले आहे. त्यामुळे सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी केलेल्या स्थलांतरास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) सदर शाळा इंग्रजी माध्यमाची स्वयंअर्थसहाय्यित तत्त्वावरील असल्याने शाळेत कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचा-यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत.

(५) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी.

(६) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०८११४७४६८७२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, pseudonym=8A56BA47E80DB19230A0A19F1AC94146E6B7B8A8, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2022.03.08 11:48:25 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे
३. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, पुणे
४. अध्यक्ष/ सचिव, धन्वंतरी शिक्षण व सामाजिक प्रतिष्ठान, पुणे
५. निवडनस्ती (एसएम-१).